सन २०१९ मधील ३३ कोटी वृक्षारोपण
कार्यक्रमांतर्गत “वृक्षलागवड व संगोपन”
<u>या साठी निधी वितरित करण्याबाबत.</u>

**महाराष्ट्र शासन.**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : पूरक २०१९/प्र.क्र.४९/कामगार-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०४/११/२०१९

<u>वाचा</u> :- (१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.सावि-२०१६/प्र.क्र.८०(भाग-२)/फ-११, दि. २५ जुलै, २०१८
(२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. सावि-२०१८/प्र.क्र.१४४/फ-११, दि. ०६.०९.२०१८
(३) उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन पत्र क्र.संकिर्ण २०१८/प्र.क्र.९८/कामगार-९, दि.२९.९.२०१८.
(४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८ जुलै, २०१९
(५) उद्योग, उर्जा व कामगार विभाग, परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/२०१९-२०२०/(प्र.क्र.३५)/प्रशासन-१, दि.१७ जुलै, २०१९.
(६) उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.पूरक २०१९/(प्र.क्र.६४)/प्रशासन-१, दि.१८ सप्टेंबर, २०१९.

<u>प्रस्तावना : -</u>

हरित महाराष्ट्र संकल्पनेंतर्गत सन २०१९ मध्ये दिनांक ०१ जुलै, २०१९ ते ३० सप्टेंबर, २०१९ या कालावधीत “३३ कोटी वृक्षारोपण कार्यक्रमाची आणि संगोपन ” या कार्यक्रमाची अमंलबजावणी करण्यासाठी नवीन लेखाशिर्ष घेऊन, त्याअंतर्गत एकंदर अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी कार्यक्रमावरील खर्चातून ०.५ % मर्यादेत तरतूद उपलब्ध करुन घेण्यास महसूल व वन विभागाने संदर्भाधीन दिनांक २५/०७/२०१८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे.

महसूल व वन विभागाच्या संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक ०६/०९/२०१८ अन्वये सन २०१९ च्या पावसाळ्सात करावयाच्या नियोजित ३३ कोटी वृक्ष लागवडीचे निभागनिहाय, जिल्हानिहाय व यंत्रणानिहाय उद्दिष्ट वाटप करण्यात आले असून त्यानुसार कामगार विभागास एकूण २,२७,९५० वृक्षारोपणाचे उद्दिष्ट निश्चित करुन देण्यात आले आहे. कामगार विभागाच्या संदर्भाधीन दिनांक दि.२९/०९/२०१८ च्या शासन पत्रान्वये कामगार विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील कार्यालयांना वृक्षारोपणाचे लक्ष नेमून देण्यात आले आहे. सदर वृक्षारोपणाचे उद्दिष्ट साध्य करण्याच्या दृष्टीने “वृक्ष लागवड व संगोपन” यासाठी निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय :-</u>

सन २०१९-२०२० मधील अर्थसंकल्पात वृक्ष लागवडीकरीता संदर्भाधीन दिनांक १७/०७/२०१९ येथील परिपत्रकान्वये एकूण रु. ३१.०० लक्ष रुपये तरतूद मंजूर करण्यात आली आहे. वित्त विभागाने यापैकी ६०% रक्कम रु.१८,६०,०००/- निधी वितरणासाठी उपलब्ध करुन दिला आहे. **कामगार विभागाअंतर्गत वृक्षारोपणाचे**

**क्षेत्रिय कार्यालयनिहाय उद्दिष्ट वाटप व निधी वितरण विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे :-**

त

| अ.क्र. | कार्यालयाचे नांव | सन २०१९ साठीचे वृक्षारोपणाचे उद्दिष्ट | एकूण वितरित करावयाचा निधी | ६०% च्या मर्यादेत वितरित करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|
| १ | कामगार आयुक्तालय | ५१,८०० | १३,४७,००० | ८,०९,२०० |
| २ | औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय | ३९,१०० | निरंक | निरंक |
| ३ | बाष्पके संचालनालय | ७१,००० | निरंक | निरंक |
| ४ | कै.नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था | ४०० | १०,००० | ५,००० |
| ५ | कामगार कल्याण मंडळ | ६५,१५० | १७,३०,००० | १०,३८,००० |
| ६ | औद्योगिक व कामगार न्यायालये | ५०० | १३,००० | ७,८०० |
| | **एकूण** | **२,२७,९५०** | **३१,००,०००** | **१८,६०,०००** |

२. वरील बाबीवर होणारा खर्च "मागणी क्रमांक के-३, मुख्यलेखाशिर्ष २४०६-वनीकरण व वन्यजीवन, ०४-वनीकरण व पर्यावरण विकास, १०१-राष्ट्रीय वनीकरण व पर्यावरण विकास कार्यक्रम, (००)(०२) शाश्वत विकास ध्येय (ध्येय १५-जमीनीवरील सजीव) अंतर्गत वृक्षलागवड आणि संगोपन, (२४०६ ए ४८१) ०२, मजूरी -१६ लाख २१, पुरवठा व सामग्री -१५ लाख (१०० टक्के राज्य योजना) (कार्यकमावरील खर्च)" वित्तीय वर्षामध्ये मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. संबंधित अधिकाऱ्यांनी उपलब्ध करुन देण्यात आलेली तरतुद तात्काळ खर्च करण्याबाबत कार्यवाही करावी. खर्च ताळमेळ व इतर वित्तीय बाबींच्या समन्वयाची जबाबादारी पार पाडण्याच्या दृष्टीने आवश्यक उपाययोजना कराव्यात. वितरीत निधी इतर कोणत्याही बाबींसाठी उपलब्ध करुन देता येणार नाही व उपलब्ध करुन देण्यात आलेल्या तरतुदीमधून झालेल्या खर्चाचे विवरणपत्र शासनास सादर करावे. तसेच वितरित केलेल्या निधीचे उपयोजिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करावे.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८/०७/२०१९ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत असून या परिपत्रकातील अटी व शर्तीचे काटेकोर पणे पालन करण्याची दक्षता घ्यावी.

५. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौसंक्र ३९६/१४६१, दिनांक ८/८/२०१९ व वित्त विभागाच्या अनौसं क्र.१६८/२०१९/व्यय-१६, दि.२९/०८/२०१९ अन्वये त्यांच्या प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

.६ सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११०४१७४०५३०११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Govindrao Sugaonkar

Digitally signed by Sudhir Govindrao Sugaonkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries, Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f108fb5ef03e8283a578fa5070c7cb09619c46836c847e6978830f509fe2c0ee, cn=Sudhir Govindrao Sugaonkar
Date: 2019.11.04 17:44:20 +05'30'

**(सुधीर सुगांवकर)**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान सचिव (कामगार व प्रशासन) यांचे स्वीय सहायक, उ.ऊ.व का.विभाग,मंत्रालय,मुंबई.

२. अवर सचिव, (प्रशासन-१), उ.ऊ.व का.विभाग,मंत्रालय,मुंबई.

३. कामगार आयुक्त,कामगार भवन,भूखंड क्र.सी-२०, ब्लॉक-इ, बांद्रा-कुर्ला संकुल, सिटी पार्क जवळ, बांद्रा (पूर्व),मुंबई-५१,

४. विकास आयुक्त (असंघटीत कामगार), कामगार भवन,भूखंड क्र.सी-२०, ब्लॉक-इ, बांद्रा-कुर्ला संकुल, सिटी पार्क जवळ, बांद्रा (पूर्व),मुंबई-५१,

५. संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, कामगार भवन, ५वा मजला, ब्लॉक-ई, भूखंड क्र.सी-२०, बांद्रा-कुर्ला संकुल, बांद्रा (पूर्व), मुंबई-४०००५१,

६. संचालक, बाष्पके, महाराष्ट्र राज्य यांचे कार्यालय, कामगार भवन, सातवा मजला, भूखंड क्र.सी-२०, ब्लॉक-इ, बांद्रा-कुर्ला संकुल, बांद्रा (पूर्व), मुंबई-४०००५१,

७. प्रबंधक, औद्योगिक न्यायालय, प्रशासकीय इमारत, पहिला मजला, वांद्रे (पूर्व),मुंबई-४०००५१.

८. संचालक, कै.नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, दादाभाई चमारबागवाला मार्ग, परेल, मुंबई- ४०००१२.

९. कल्याण आयुक्त, महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ, हुतात्मा बाबु गेनू मुंबई गिरणी कामगार क्रिडा भवन, सेनापती बापट मार्ग, एलफिन्स्टन, मुंबई-४०००१३.

१०. निवडनस्ती (काम ९)